ॐ श्रीगणेशाय नमः । आदिशक्ति अन्य शक्तींस सांगत । एकमेव

अद्वितीय जें ख्यात । परब्रह्म जें वेदांत । तोचि विकट गजानन ।।१।। त्यानें माया केली उत्पन्न । त्यांत बिंबित ब्रह्म पावन । विकटाचें जें आत्माकार प्रसन्न । सर्वत्र भ्रमस्थ जीववाचक ।।२।। त्या विकटापासून । संज्ञा जाहली उत्पन्न । तीच भार्या रवीची होऊन । खेळकरी माया तीच असे ।।३।। बिंबमय वीर्यापासून । नाना जीव तिच्यांत उत्पन्न । त्यांचा प्रसवदाता म्हणून । सूर्य नामें ख्यात असे ।।४।। संज्ञेसहित सूर्य ज्ञानहीन । घोर तप करी एकमन । गणेशाचें करी ध्यान । दिव्य वर्ष सहस्त्रावधी ।।५।। एकाक्षर मंत्र जपें अविरत । तोषवी तो गणेशचित्त । तोही भक्तवत्सल कारणें प्रकटत । म्हणे सूर्या वर माग ।।६।। सूर्यासी तो तैं सांगत । वर माग जो असेल वांछित । देईन मी तपें संतुष्ट । जरी दुर्लभही तो असेल ।।७।। भानु गणेशास पाहून । जाहला हर्षोत्फुल्ल प्रसन्न । संज्ञेसहित उभा राहून । प्रणाम करी गजाननासी ।।८।। पुन:पुन: त्यास नमित । महायश त्यास पूजित । कर जोडून संज्ञेसहित । स्तवन करी भक्तिभावें ।।९।। विकटासी मायामायिकरूपासी । वामांगी संज्ञा ज्याच्या त्यासी । दक्षिणांगीं भानू सेवी जयासी । त्या गणाधीशा नमन असे ।।१०।। सिद्धिबुद्धिपतीसी । भानू संज्ञायोगें त्या गजाननासी । एकमेव अद्वितीय ब्रह्मासी । कैसें वर्णू तयासी मी ।।११।। धन्य मी सर्वभावें जगांत । पाहिला गजानन देव श्रेष्ठ । त्या सर्वादिपूज्यास नमित । गजाननासी परमात्म्यासी ।।१२।। हेरंबासी सदा ज्येष्ठराजासी । परेशासी महाविघ्ननाशनासी । महात्म्यासी दुरात्म्यांस दंडकर्त्यासी । महाविघ्नदायका नमन ।।१३।। अनाथासी सनाथनाथासी । सर्वदायकासी अनाथनाथासी । नाथनाथासी अनंत विश्वासी । अनंतमायाधरा नमन ।।१४।। ब्रह्मणस्पतीसी कवीसी । मूषकवाहनासी सर्वांतरप्रचारीसी । मूषकध्वजासी मयूरेशासी । नमन तुजला पुन:

पुनः ।।१५।। किती करूं मी तुझी स्तुती । पंचचित्त प्रचालक तूं असती । गणाधीशा म्हणोनि तुजसी । प्रणाम करितों तुष्ट होई ।।१६।। ऐसी स्तुति जैं गात । तैं रोमांचित शरीर होत । सद्गद कंठ वर्तत । नाचतसे आनंदानें ।।१७।। तेव्हां गणेश त्यास म्हणत । तूं केलेलें हें स्तवन मज संमत । सर्वप्रद होईल निश्चित । पाठकां तैसे वाचकांसी ।।१८।। जें जें इच्छित असेल मनांत । तें तें देईन मी संतुष्ट । स्तोत्रपाठकास अन्तीं करित । ब्रह्ममय महामते ।।१९।। तुज देईन वर निश्चित । मीं असे भक्तिमोहित । तूं स्त्रीसहित प्रख्यात । भक्तश्रेष्ठ होशील माझा ।।२०।। भानु म्हणे तैं गणेशाप्रत । माझ्यावरी ढुंढें तूं संतुष्ट । भक्ति दे तुझी दृढ सतत । स्वाभाविक ज्ञान मज देई ।।२१।। नाना कार्य करण्याचें बळ । सर्वात्मकारक दे शरीर बळ । मज करी गणेश भक्त निर्मळ । गाणपत्यप्रिय सर्वदा ।।२२।। तूं माझा पुत्र व्हावें । तारणात्मक जगीं स्वभावें । तेथ मीं तुज प्रेमें भजावें । निरंतर पुत्रभावानें ।।२३।। हृदयांत चित्तसंस्थ । देवस्वरूपास मी मूर्त । नित्य ध्याता कृतकृत्य होत । ऐसें करी गजानना ।।२४।। तथाऽस्तु म्हणून अन्तर्धान । पावले देव गजानन । सूर्य त्यांचें करी चिंतन । प्रियेसह घरीं परतला ।।२५।। सूर्य नंतर सत्तायुक्त । ज्ञानवंत निर्मी असद्ब्रह्म अद्भुत । जें नाना रूपयुक्त । परम आश्चर्यकारक ।।२६।। गणेशाच्या वरदानानें मोहहीन । भानू त्याचें करी भजन । योगीन्द्र वंद्य भक्तियुक्त मन । श्रेष्ठ भक्त गणेशाचा ।।२७।। एके दिनीं प्रियेसहित । गणनायकास तो स्मरत । तामिस्त्र असुरें बळ गर्वित । पीडित बहुत जाहला ।।२८।। स्मृतीनें आठवित स्वसुत । बाळ जो शुंडाधर उदात्त । त्यास पाहून विभावसू म्हणत । कोण तूं बाळा गणेशाकृती ।।२९।। येथ कां रे आलास । कीं तूं गणेश परमेश । सूर्याच्या ऐकून वचनास ।

त्यास म्हणे गजानन ।।३०।। स्मृतिउत्पन्न मी तुमचा सुत । सूर्या विघ्नेश्वर साक्षात । पूर्वीं वर दिला तो स्मर चित्तांत । पुत्र तुझा मी जाहलों ।।३१।। आतां माझें करी पालन । पित्या संज्ञेसह करी लालन । त्याचें तें वचन ऐकून । संज्ञेसह अर्यमा प्रणाम करी ।।३२।। पूजा करून त्यास स्तवित। अथर्वशीर्षावर्तन करित । एवढ्यांत तामिस्त्रासुर येत । सविता देवासन्निध ।।३३।। त्यास पाहून भयें पळत । गणनाथ परी निर्भयचित्त । उठून मुष्टिघातें त्यास ताडित । पाडिला त्यास भूमीवरी ।।३४।। तो दैत्यपुंगव निर्जीव पडला । तें पाहून सविता परतला । गणनाथास वंदून उभा राहिला । दिङ्मुढ गणेशमायेनें ।।३५।। संज्ञेसह त्यास स्वीकारित । पुत्रभावें होऊन मोहित । लालन करी अतिहर्षित । अपूर्व सुतलाभानें ।।३६।। गणेशमायेनें संज्ञा देत । त्या गणेशास स्तनपान विनत । वर देऊन पुत्र जात। वरदाख्य नाव ऐशा तें ।।३७।। तदनंतर पुत्र अंतर्हित। होतां भानू पडला मूर्च्छित । संज्ञेसहित अति दु:खित । तेव्हां त्यांच्या हृदयांत ।।३८।। स्वयमेव ढुंढी विलसत । प्रकट होऊन उपदेश करित। म्हणे शोक करूं नका चित्तांत । माझा वियोग न घडेल ।।३९।। माझी मूर्ति बनवून । तिचें करा निरंतर पूजन । तदनंतर तीं सावधान । जाहलीं संज्ञा सूर्यदेव ।।४०।। जैसें पुत्रे कथिलें। तैसें त्यांनी आदरें केलें । भक्तीनें सदा भजन केलें । मूर्ती तयाची स्थापूनी ।।४१।। अन्यशक्ति तैं विचारीत । कोण हा तामिस्त्र असुर असत । त्याचें सांग आम्हां वृत्त। ज्यास्तव वरद अवतार झाला ।।४२।। आदिशक्ति तेव्हां त्यांस सांगत। सूर्यास एकदा अहंकार होत । मीं सर्वांचा जीवनात्मक जगांत । सर्वांचा मी प्रकाशदाता ।।४३।। मी तेज:पुंज सर्वांत । माझ्या सम कोणी न विश्वांत । तदनंतर बहु काळ जात । विसरला तो गणनायकासी ।।४४।। पुढें छायेसह संग घडत । तिच्यापासून जन्मला सुत।

तो हा तामिस्त्र नामें ख्यात । त्यास स्वीकारी पुत्रत्वें ।।४५।। अंधकारकरास त्या म्हणत । पुत्रा त्रिगुणापासून अभय तुजप्रत । त्रैलोक्याचें राज्य अद्भुत । दिलें तुजला प्रेमानें ।।४६।। जें जें इच्छिसी मनांत । तें तें सर्व सफल निश्चित । होईल तुझें नांव ख्यात । तामिस्त्र तूं भाग्यवंत ।।४७।। त्यास प्रणाम करून । महादैत्य तो जाई निघोन। पाताळांत करी गमन । तेथ शुक्राचार्य प्रेरी तया ।।४८।। दैत्य त्यास राजा करिती । देवांचा द्वेष्टा म्हणून स्तविती । त्यांच्यासह तो त्वरितगति। ब्रह्मांड मंडळ जिंकीतसे ।।४९।। दैत्येशांसह राज्य करित । झाला होता अति बळवंत । सूर्यास पाहून तेजयुक्त । वैरभाव त्याच्या मनांत ।।५०।। तो अंधकारें आच्छादित। शक्तींनो सूर्यास सतत । सूर्यास निरर्थक करित। तेजस्व्यांत श्रेष्ठ तो होता ।।५१।। नाना यत्न जरी करित । तरी सूर्य त्यास जिंकूं न शकत। तेव्हां अहंकारहीन होत । स्मरे चित्तीं गणनायकासी ।।५२।। तैं अवतरला गजानन । मानसपुत्र रवीचा होऊन। तें कथिलें वृत्त शोभन । त्या बाळ गणेशें असुर मारिला ।।५३।। सूर्याचें केलें संरक्षण । तामिस्त्रासी ठार मारून । हें सर्व सूर्यपुत्राचें कृत्य महान । वरददेवाचें कथिलें तुम्हां ।।५४।। हें सर्वसिद्धिकर आख्यान। महादेवींनो जो करी वाचन। अथवा ऐकेल मन लावून । पूर्ण त्याचे सर्व मनोरथ ।।५५।। तो अन्तीं ब्रह्मभूत । पावेल स्वानंदपद अधिकृत। ऐसे हें विकट वरद चरित। सौख्यप्रद सर्वदा ।।५६।। ओमिति श्रीमदान्त्ये पुराणोपनिषदि श्रीमन्मौद्गले महापुराणे षष्ठे खंडे विकटवरदचरितं नाम चतुश्चत्वारिंशत्तमोऽध्यायः समाप्तः । श्रीगजाननार्पणमस्तु ।

(अध्याय चव्वेचाळिसांवा संपूर्ण)